शासनाकडे स्वाधीन केलेल्या सदनिकेचे/ घराचे भाडे भरपाईबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वित्त विभाग,

शासन निर्णय क्रमांक सीपीए–1497/सीआर–147/सेवा–5,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 5 डिसेंबर 1997.

**पहा :–** (1) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सीपीए–1476/1169–सी/सेवा–5, दिनांक 5 ऑगस्ट 1976.

(2) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सीपीए–1479/सीआर–1292(1)/सेवा–5, दिनांक 14 सप्टेंबर 1979.

(3) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सीपीए–1487/995/87/सेवा–5, दिनांक 9 मे 1988.

(4) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सीपीए–1490/269/90/सेवा–5, दिनांक 1 डिसेंबर 1990.

(5) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सीपीए–1491/प्र.क्र.2/सेवा–5, दिनांक 29 सप्टेंबर 1992.

(6) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सीपीए–1494/प्र.क्र.116/सेवा–5, दिनांक 3 जानेवारी 1996.

**शासन निर्णय :–** शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक सीपीए–1494/प्र.क्र.116/सेवा–5, दिनांक 3 जानेवारी 1996 अन्वये शासन स्वाधीन सदनिकेची भाडे भरपाई, सदनिका कर्मचा–याच्या सेवा मुख्यालयी आहे किंवा कसे, हे विचारात न घेता, सर्व प्रकरणी सूत्र–2 प्रमाणे देय ठरविण्यात आली आहे. सदनिकेच्या किमती निर्धारणामध्ये अंतर्भूत होणा–या अनुषंगिक बाबी विचारात घेऊन भाडे भरपाईच्या रकमेच्या सूत्रामधील भांडवली गुंतवणुकीच्या आधारे काढलेल्या परतीच्या रकमेच्या घटकामध्ये सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन आता असा आदेश देत आहे की, शासन स्वाधीन सदनिकेच्या भरपाई भाड्याची रक्कम ठरविण्याच्या सूत्र–दोन मधील एकूण गुंतवणुकीच्या 10 टक्के मध्ये वाढ करुन ती 12 टक्के करण्यात यावी.

2. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 14 सप्टेंबर 1979 अन्वये विहित केलेल्या शासन स्वाधीन सदनिकेबाबतच्या भाडे भरपाईचे सूत्र–दोन या आदेशाच्या मर्यादेपर्यन्त सुधारण्यातआले आहे असे समजण्यात यावे. परंतु शासन स्वाधीन सदनिकेच्या भाडे भरपाईची रक्कम ठरविण्यासाठी विहित करण्यात आलेल्या अन्य तरतुदी तशाच लागू राहतील. सुधारित सूत्र–दोन पुढीलप्रमाणे राहील.

<u>सूत्र – दोन</u>

एकूण गुंतवणुकीच्या 12 टक्के अधिक म्युनिसिपल टॅक्सेस, अधिक भुईभाड्यापोटी द्यावी लागणारी रक्कम (बिगर निवासी वापरासाठी देण्यात आलेल्या जागेबद्दलचे अनुज्ञप्ती शुल्क (Licence Fee) वगळून, अधिक 50 टक्के सेवाशुल्क.

3. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
उप सचिव, वित्त विभाग.

प्रत

महालेखापाल–1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल–2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र नागपूर,

शामभु–रोटा–विवि–एच–1207(12500+20–12–97)

महालेखापाल–1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल–2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयातील सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा–5,

---

* पत्राने.